**महाराष्ट्र अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये प्रमाणसंहिता (शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे सुधारित वेतन) नियम, २००९.**
**वेतननिश्चिती संबंधी सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१९/प्र.क्र.७२/१९/विशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १३ डिसेंबर, २०१९

<u>वाचा :-</u>

१. शासन अधिसूचना, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण- २००९/(३२६/०९)/विशि-१, दि.०७.१०.२००९.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. वेपुर-१२१०/प्र.क्र.१२४ (भाग-१)/सेवा-९, दि.०९.०२.२०१६

<u>प्रस्तावना:-</u>

संदर्भ क्र.१ येथील शासन अधिसूचनेन्वये अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासन अधिसूचना दि.०७.१०.२००९ अन्वये ६ व्या वेतन आयोगाच्या वेतनश्रेण्या लागू करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार वेतननिश्चिती कशी करण्यात यावी याबाबतच्या सूचना सुध्दा सदरहू अधिसूचनेन्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. १) राज्य शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत दि.०१.०१.२००६ पूर्वी/रोजी अथवा त्यानंतर पदोन्नत झालेल्या काही संवर्गातील ज्येष्ठ कर्मचाऱ्यांचे वेतन दि.०१.०१.२००६ रोजी अथवा त्यानंतर त्याच सवंर्गात नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या वेतनबँडमधील प्रारंभिक वेतनापेक्षा कमी वेतनावर निश्चित होते.

२) तसेच दि.०१.०१.२००६ पूर्वी नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या ज्येष्ठ कर्मचाऱ्यांचे वेतनबँडमधील वेतन दि.०१.०१.२००६ रोजी अथवा त्यानंतर त्याच संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या वेतनबँडमधील प्रारंभिक वेतनापेक्षा कमी वेतनावर निश्चित होते. अशा कर्मचाऱ्यांच्या प्रारंभिक वेतनामध्ये तफावत निर्माण होत होती.

त्यामुळे त्यांच्या वेतनामध्ये निर्माण झालेली तफावत दूर करण्याबाबतचा निर्णय वित्त विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

३. परि.क्र.२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे या विभागाच्या अधिनस्त असलेल्य अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांच्या बाबतीतसुध्दा प्रारंभिक वेतनात तफावत निर्माण होत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ज्याप्रमाणे कर्मचाऱ्यांच्या वेतनामध्ये निर्माण होणारी तफावत दूर करण्याबाबत निर्णय घेतला आहे. त्याच धर्तीवर अकृषि विद्यापीठे व संलग्नित अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील कर्मचाऱ्यांच्या वेतनामध्ये निर्माण होणारी तफावत दूर करण्याबाबतचा निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय:-</u>

शासन या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

१. १) दि.०१.०१.२००६ पूर्वी/रोजी अथवा त्यानंतर पदोन्नत झालेल्या काही संवर्गातील ज्येष्ठ कर्मचाऱ्यांचे वेतनबँडमधील वेतन दि.०१.०१.२००६ रोजी अथवा त्यानंतर त्याच सवंर्गात नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या वेतनबँडमधील प्रारंभिक वेतनापेक्षा कमी वेतनावर निश्चित होते.

२) तसेच दि.०१.०१.२००६ पूर्वी नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या ज्येष्ठ कर्मचाऱ्यांचे वेतनबँडमधील वेतन दि.०१.०१.२००६ रोजी अथवा त्यानंतर त्याच संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या कनिष्ठ कर्मचाऱ्यांच्या वेतनबँडमधील प्रारंभिक वेतनापेक्षा कमी वेतनावर निश्चित होते. अशा कर्मचाऱ्यांच्या प्रारंभिक वेतनामध्ये निर्माण होणारी तफावत दूर करण्याकरीता कनिष्ठ कर्मचारी ज्या तारखेपासून ज्येष्ठ कर्मचाऱ्यापेक्षा जास्त वेतन घेत असेल त्या तारखेपासून ज्येष्ठ कर्मचाऱ्याचे वेतन कनिष्ठ कर्मचाऱ्याच्या वेतनबँडमधील वेतनाइतके वाढविण्यात यावे. मात्र त्यासाठी पुढील अटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

क) ज्येष्ठ व कनिष्ठ कर्मचारी एकाच संवर्गातील असावेत आणि सेवाप्रवेश नियमांनुसार त्या संवर्गात पदोन्नत आणि नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याची तरतुद असावी.

ख) नामनिर्देशनाने नियुक्त झालेला कनिष्ठ कर्मचारी नामनिर्देशनाने/पदोन्नतीने नियुक्त ज्येष्ठ कर्मचाऱ्यापेक्षा प्रत्यक्षात अधिक वेतन घेत असला पाहिजे. ज्या संवर्गात कोणताही कनिष्ठ कर्मचारी ज्येष्ठ कर्मचाऱ्यांपेक्षा प्रत्यक्षात अधिक वेतन घेत नाही, अशा प्रकरणी ज्येष्ठ कर्मचाऱ्यांना वेतन उंचावून देण्याची मागणी करता येणार नाही.

ग) ज्या संवर्गात नामनिर्देशनाने नियुक्ती करण्याची तरतुद नाही त्या संवर्गातील पदोन्नत कर्मचाऱ्यांना वेतन उंचावून देण्याची मागणी करता येणार नाही.

घ) कनिष्ठ कर्मचाऱ्याची वेतननिश्चिती महाराष्ट्र अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये प्रमाणसंहिता (शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे सुधारित वेतन) नियम, २००९ मधील विहित तरतुदीनुसार झालेली असणे आवश्यक राहील.

च) कनिष्ठ कर्मचाऱ्यास सेवाप्रवेशाच्या वेळेस आगाऊ वेतनवाढी मंजूर केलेल्या असल्यास ज्येष्ठ कर्मचाऱ्यांना वेतन उंचावून देण्याची मागणी करता येणार नाही.

छ) तात्पुरत्या अथवा तदर्थ (Ad-hoc) स्वरुपात पदोन्नत ज्येष्ठ कर्मचाऱ्यांना वेतन उंचावून देण्याची मागणी करता येणार नाही.

ज) दि.०२ जुलै ते दि.०१ जानेवारी दरम्यान वेतन उंचावून दिल्यास पुढील वेतनवाढ दि.०१ जुलै रोजी देण्यात यावी. परंतु दि.०२ जानेवारी ते दि.३० जून दरम्यान वेतन उंचावून दिल्यास पुढील वेतनवाढ पुढील वर्षाच्या दि.०१ जुलै रोजी देण्यात यावी.

झ) वरील परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद प्रकरणी संवर्गात केवळ नामनिर्देशनाने नियुक्तीची तरतूद असली तरी महाराष्ट्र अकृषि विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालये प्रमाणसंहिता (शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे सुधारित वेतन) नियम, २००९ मधील परिच्छेद क्र.७ मधील टीप-७ मध्ये विहित अन्य अटींच्या अधीन राहून ज्येष्ठ कर्मचाऱ्याचे वेतन उंचावून देण्यात यावे.

२. दि.०१ जानेवारी, २००६ ते दि.३१ जानेवारी, २०१६ या कालावधीत जे ज्येष्ठ कर्मचारी वेतन वाढवून देण्यास पात्र आहेत, त्यांची संबंधित दिनांकापासून वेतन वाढवून वेतननिश्चिती करण्यात यावी. मात्र वाढीव वेतनाचे प्रत्यक्ष लाभ दि.०१.०२.२०१६ पासून देण्यात यावेत. त्यापूर्वीच्या काल्पनिक वेतननिश्चितीची थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही.

३) दि.०९.०२.२०१६ या दिनांकापर्यंत सेवानिवृत्त झालेल्या पात्र कर्मचाऱ्यांच्या बाबतीत देखील वरीलप्रमाणे कार्यवाही करून केवळ निवृत्तीवेतन सुधारित करण्यात यावे. सुधारित निवृत्तीवेतनाचे प्रत्यक्ष लाभ दि.०१.०२.२०१६ पासून अनुज्ञेय करण्यात यावेत. त्यापूर्वीची थकबाकी अनुज्ञेय राहणार नाही. तसेच सेवानिवृत्तीवेतन सुधारित केले तरी त्या अनुषंगाने सेवानिवृत्तीविषयक इतर लाभ सुधारित करण्यात येऊ नयेत.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३०/२०१९/सेवा-९, दि.१९.१०.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून तीचा संकेतांक क्र. २०१९१२१३११५४५४२१०८ असा आहे. सदरहू अधिसूचना डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Eknath Sable

Digitally signed by Vijay Eknath Sable
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad74dd20b49c8ab0bc83f54f3d9c91571a6cd47aeb9a9f05783d44cafe7a7d8e, serialNumber=ad8df0c87ab8e6c9f8574ab838dd4c466ebe81828f43e76bfa02129f8e862cd2, cn=Vijay Eknath Sable
Date: 2019.12.13 11:58:55 +05'30'

**( विजय साबळे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. कुलगुरू, सर्व अकृषि विद्यापीठे,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१, महाराष्ट्र,
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर-२, महाराष्ट्र,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) नागपूर-२, महाराष्ट्र,
८. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण,
१०. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी,
१३. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
१४. उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने,
१५. निवड नस्ती (विशि-१)